पुणे-नाशिक या नवीन रेल्वे मार्ग प्रकल्पाकरीता रु.१०० कोटी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. आरएलवाय-०६२१/प्र.क्र.६७/परिवहन-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २५ ऑक्टोबर, २०२१

वाचा : १) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आरएलवाय-०२१२/१८०/प्र.क्र.३७/परिवहन-५, दिनांक १५ एप्रिल,२०२१.
२) जिल्हाधिकारी अहमदनगर यांचे पत्र क्र.भूसं/कार्या/१६-अ/९८५/२०२१, दिनांक १२.१०.२०२१.
३) जिल्हाधिकारी पुणे यांचे पत्र क्र. PLAK-१/कावि/५१०/२०२१, दिनांक १८.१०.२०२१.
४) जिल्हाधिकारी नाशिक यांचे पत्र क्र.भूसं/कक्ष/१०/३/कावि/८००/२०२१, दिनांक १२.१०.२०२१.
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास महामंडळ, यांचे पत्र क्र.MRIDC/PROJ/CORRS/PUN-NSK, दिनांक १९.१०.२०२१.

**प्रस्तावना :**

**पुणे-नाशिक** या २३५.१५ कि.मी. लांबीच्या नवीन दुहेरी मध्यम अतिजलद रेल्वे मार्गाचे बांधकाम करण्यासाठी राज्य शासनाचा आर्थिक सहभाग घेण्याबाबतचा निर्णय राज्य मंत्रिमंडळाने दिनांक ८ मार्च, २०२१ रोजीच्या बैठकीत घेतला आहे. सदर रेल्वे प्रकल्पाकरिता रु.१६०३९.०० कोटी खर्चाच्या अंदाजपत्रकास राज्य मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. या प्रकल्पाची उभारणी महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास महामंडळामार्फत (MRIDC) ६०% (रु.९६२३.०० कोटी) कर्ज आणि ४०% (रु.६४१६.०० कोटी) समभागमुल्य या प्रमाणात राबविण्यात येणार आहे. या समभागमुल्यातील राज्य शासनाचा अर्धा हिस्सा रु.३२०८.०० कोटी (५०%) रक्कमेचे समभाग घेण्यास दिनांक १५.०४.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. या समभागमुल्यातील राज्य हिश्श्याच्या रु.३२०८ कोटीपैकी रु.१०० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास महामंडळ (MRIDC), मुंबई यांना प्रस्तावनेत नमूद प्रयोजनासाठी रु.१००.०० कोटी (रुपये शंभर कोटी फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजूरी देण्यात येत आहे. सदर रक्कम महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास महामंडळाने पुढील तक्त्यामध्ये दर्शविल्यानुसार जिल्हाधिकारी पुणे, नाशिक व अहमदनगर यांना अदा करावी व तसा अहवाल शासनास सादर करावा.

| अ.क्र. | जिल्हाधिकारी | रक्कम |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी, पुणे | रु.५८.८४ कोटी |
| २ | जिल्हाधिकारी, अहमदनगर | रु.१७.६४ कोटी |
| ३ | जिल्हाधिकारी, नाशिक | रु.२३.५२ कोटी |
| | **एकूण** | **रु.१०० कोटी** |

२. शासनाने सह सचिव/उप सचिव (अर्थसंकल्प), गृह विभाग यांना नियंत्रण अधिकारी व अवर सचिव/ कक्ष अधिकारी, रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित केले असून या शासन निर्णयाव्दारे त्यांना सदर रक्कम प्रदान करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. यासाठी येणारा खर्च सन २०२१-२२ या वर्षात मागणी क्र.बी-७, ३००१ भारतीय रेल्वे धोरण निश्चिती, संचालन, संशोधन व इतर संकीर्ण संघटना, ००, ८००-इतर खर्च, (००), (००) (०२)-रेल्वे प्रकल्पामध्ये राज्य शासनाचा सहभाग (३००१ ००५४), ३२-अंशदाने या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. महाराष्ट्र शासन, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२० सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सदर देयकांन्वये आहरीत करण्यात येणा-या रक्कमेचे स्वरुप “अंशदाने” या तपशीलवार शिर्षाखाली येते. त्यानुसार तपासणी करावयाच्या सुचीत नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तींचे तसेच उक्त परिपत्रकाच्या परिच्छेद ४ ते १३ मधील अटी व शर्तींचे पालन करण्यात आले आहे.

५. प्रमाणित करण्यात येते की, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल,२०२० सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील क्रमांक १ ते १० मधील अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१११/१४६१, दिनांक १६.०९.२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३८५/२०२१/व्यय-८, दिनांक २७.०९.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११०३१५०३५७०४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAJENDRA MOTIRAM HOLKAR

Digitally signed by RAJENDRA MOTIRAM HOLKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ac1bf43d6978ca6d925e9240f8c09bf2f3128ad5d62a0dd7d57d2b72c9ea41f4, pseudonym=D247A5CA6B26BCB0990C6082FBF829BF9C8E55B1, serialNumber=48F41D082A9DD86B54CCCF5B4C6A83A6132C3F6F06A9940BD960612800458BA7, cn=RAJENDRA MOTIRAM HOLKAR
Date: 2021.12.15 12:38:53 +05'30'

**( रा. मो. होळकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल, १ व २ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (MRIDC), मुंबई.
५) जिल्हाधिकारी, पुणे / अहमदनगर / नाशिक.
६) बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) वित्त विभाग, व्यय-८/बीयुडी-११, मंत्रालय, मुंबई.
८) नियोजन विभाग, कार्यासन १४६१, मंत्रालय, मुंबई.
९) रोख शाखा, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, सदर रक्कम ही Maharashtra Rail Infrastructure Development Corporation Limited-MRIDC यांना धनादेशाद्वारे अदा करण्यात यावी.
१०) निवड नस्ती परिवहन-५.